विभागीय चौकशीची कार्यवाही करण्यासाठी
पोलीसांच्या ताब्यात असलेल्या कागदपत्रांच्या प्रती
विभागीय अधिकाऱ्यांना उपलब्ध करुन देण्याबाबत-

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन परिपत्रक,क्रमांक सीडीआर-२०११/प्र.क्र.१४२/११
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२, दिनांक ३१ डिसेंबर, २०११

परिपत्रक

शासकीय कर्मचाऱ्यावर अभियोग दाखल करण्यास मंजुरी देतानाच त्याच्याविरुद्ध विभागीय चौकशीची कार्यवाही सुरू करण्याचा विचार करणे आवश्यक आहे. तथापि, अभियोगाच्या कार्यवाहीसाठी सदर शासकीय कर्मचाऱ्यावरील दोषारोपांशी संबंधित मूळ कागदपत्रे पोलीसांनी ताब्यात घेतली असल्यास कागदपत्रांअभावी संबधित कर्मचाऱ्यावर विभागीय चौकशीची कार्यवाही सुरू करणे शक्य होत नाही, ही बाब लक्षात घेऊन पंचायत राज समितीने त्यांच्या सन २००५-२००६ च्या तिसऱ्या अहवालात अशी शिफारस केली आहे की, पोलीसांच्या ताब्यात असलेल्या मूळ कागदपत्रांच्या प्रमाणित छायाप्रती विभागीय अधिकाऱ्यांना उपलब्ध करुन देण्याबाबत आवश्यक त्या सूचना सर्व संबंधितांना देण्यात याव्यात.

२. कर्मचाऱ्यावर न्यायालयात अभियोग दाखल करतानाच त्याच्याविरुद्ध विभागीय चौकशीची कार्यवाही करण्यासाठी त्या प्रकरणातील आवश्यक त्या सर्व कागदपत्रांच्या फोटो स्टॅट प्रती काढून घ्याव्यात अशा आशयाच्या सूचना विभागीय चौकशी नियमपुस्तिका, १९९१ मधील परिच्छेद-४.२ अन्वये देण्यात आल्या आहेत. तथापि, पोलीसांनी एखाद्या प्रकरणी अचानक कार्यवाही केल्यास ज्या आधारे कर्मचाऱ्यावर दोषारोप ठेवावयाचे आहेत त्या कागदपत्रांच्या प्रती काढून घेणे शक्य होणार नाही. त्यामुळे, पंचायत राज समितीच्या वरील शिफारशीच्या अनुषंगाने आता असे कळविण्यात येते की, न्यायालयात अभियोगासाठी पोलीस यंत्रणेने मूळ कागदपत्रे आपल्या ताब्यात घेतली असतील अशा प्रकरणी संबंधितांवर त्याचवेळी विभागीय चौकशीची कार्यवाही करणे शक्य व्हावे म्हणून त्या कागदपत्रांच्या प्रमाणित छायाप्रती तयार करण्यास पोलीस यंत्रणेने विभागीय अधिकाऱ्यांना अनुमती द्यावी.

हे परिपत्रक शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१२०१०२१९२५२३४००१ असा आहे.

गोभशिंदे
(गो.भ.शिंदे)
शासनाचे अवर सचिव

प्रत:

राज्यपालांचे सचिव,

मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,

उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,

मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,

शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव,

सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/ स्वीय सहायक,

*प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,

*प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,

*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

*सचिव, महाराष्ट्र विधानसभा सचिवालय, मुंबई,

*सचिव, महाराष्ट्र विधानपरिषद सचिवालय, मुंबई,

*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

*आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, मुंबई

सर्व मंत्रालयीन विभाग,

सर्व मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख,

सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासन,

महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई (५ प्रती),

विधानमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई (१० प्रती),

<u>निवडनस्ती</u>

*पत्राने

------